**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीच्या अधिकारांबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र. २२/पापु-०७**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत,
मंत्रालय, मुंबई-४००००१
तारीखः १६ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र. २२/पापु-०७, दिनांक ९ जुलै, २०१४
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग, झेडपीए-२०१२/प्र.क्र. ६८०/वित्त-०९, दिनांक ३१ जानेवारी, २०१३

**शासन परिपत्रक :**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, अंमलबजावणी, त्रयस्थ तांत्रिक परिक्षण व देखभाल दुरुस्तीबाबत सुधारित मार्गदर्शक सुचना पारित करण्यात आलेल्या आहेत. या शासन निर्णयामुळे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय मान्यतेचे तसेच अंमलबजावणीचे काही प्रमाणातील अधिकार जिल्हा परिषद स्तरावर बहाल करण्यात आलेले आहेत.

संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये ग्रामविकास व जलसंधारण विभागाकडील जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांमधील बांधकामे/विकास योजना यांच्याशी संबंधीत निविदा (कंत्राट) स्विकारण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. तथापि, पाणी पुरवठा विभागाशी संबंधीत असलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील सुधारित मार्गदर्शक सुचनांच्या शासन निर्णयात ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंदाजपत्रकीय दराने प्राप्त झालेल्या निविदा स्विकृत करण्याविषयी कोणताही उल्लेख नसल्याने याबाबत सुस्पष्ट निर्देश मिळण्याची विनंती अनेक मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शासनास केली आहे.

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या जिल्हा वार्षिक कृती आराखड्याच्या आर्थिक व भौतिक प्रगतीचे संनियंत्रण करणे ही पूर्णत: जबाबदारी जिल्हा परिषदांवर सोपविण्यात आली आहे. तसेच रु. ७.५० कोटी पर्यंतच्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मंजूरी देण्याचे व अंमलबजावणी करण्याचे अधिकार जिल्हा परिषदेस देण्यात आलेले आहेत.

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या तांत्रिक मान्यता, प्रशासकीय मान्यता, अंमलबजावणी, त्रयस्थ तांत्रिक परिक्षण व देखभाल दुरुस्तीबाबत मोठ्या प्रमाणावर

बदल केलेले असल्याने ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृती प्रक्रियेत सुसुत्रता आणण्यासाठी ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीचे अधिकार खालील प्रमाणे संबंधीत प्राधिकारी/प्राधिकरण यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | ग्रामीण पाणी पुरवठा योजनेचा प्रकार | ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीचे अधिकार (अंदाजपत्रकीय दराने प्राप्त होणाऱ्या निविदांसाठी) | | |
|---|---|---|---|---|
| | | ग्रामसभा | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | निविदा समिती, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| १ | स्वतंत्र ग्रामीण पाणी पुरवठा योजना | रु. ५०.०० लक्ष पर्यंत | रु. ५०.०० लक्ष ते रु. ७.५० कोटी पर्यंत | रु. ७.५० कोटीहून अधिक |
| २ | प्रादेशिक ग्रामीण पाणी पुरवठा योजना | -- | रु. ७.५० कोटी पर्यंत | रु. ७.५० कोटीहून अधिक |

अंदाजपत्रकीय दरापेक्षा अधिक रकमेच्या निविदा प्राप्त झाल्यास अशा निविदा स्विकृतीसाठी शासनाची पूर्व मान्यता घेणे आवश्यक राहिल. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या निविदा स्वीकृतीसाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची यापूर्वीची कार्यपद्धती पुढेही सुरु राहील.

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत मंजूर झालेल्या सर्व ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी सदर परिपत्रक लागू राहिल. तथापि, ज्या योजनांची निविदा स्विकृती शासन परिपत्रका पूर्वीच झालेली असेल अशा योजनांसाठी या परिपत्रकातील तरतूदी लागू राहणार नाहीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक 201502131732376628 असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jirgale Sarita D

Digitally signed by Jirgale Sarita D
DN: CN = Jirgale Sarita D, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.02.16 16:50:49 +05'30'

(सरिता जिरगाळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१३.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१६.मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१७.अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१८.कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९.कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
२०.मंत्रालयीन इतर सर्व विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेली सर्व कार्यालये.
२१.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने.
२२.निवडनस्ती, कार्यासन पापु-०७.